**सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षातील, राज्यातील चारही कृषि विद्यापीठांतर्गत अधिकारी / कर्मचारी यांच्या नविन परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेवरील व्याजाची रक्कम समायोजित करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक कृषिवि-३७२३/प्र.क्र.१४/७-अे**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक :- २९ मार्च, २०२३

**वाचा :-** १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. कृविआ १११०/प्र.क्र.१००/६अे, दि.२७.०२.२००९ व दि.०५.०३.२०११.
२) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र. ४३/अर्थ-३, दि.१६.०३.२०२३.

**शासन निर्णय :-**

राज्यातील चारही कृषि विद्यापीठांतर्गत अधिकारी /कर्मचाऱ्यांसाठी नविन परिभाषीत अंशदान निवृत्तीवेतन योजना संदर्भीय क्र. १ च्या शासन निर्णय दि. २७.०२.२००९ च्या अन्वये लागू करण्यात आली व दि.०५.०३.२०११ चे शासन निर्णयान्वये योजना लागू करण्याची कार्यपद्धती विहित करण्यात आलेली आहे. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी “मागणी क्र. जी -३, २०४९- व्याज प्रदाने, ६०- इतर दायित्वांवरील व्याज, १०१- ठेवींवरील व्याज,(००) (००)(०५) - अंशदान निवृत्तीवेतनाच्या अंशदानावरील व्याज (अनिवार्य) (२०४९ २२४६ ) ४५- व्याज (भारीत)” या लेखाशिर्षाखाली रु.३५,००,००,०००/- (रुपये पस्तीस कोटी फक्त) या शासन निर्णयाव्दारे महालेखापाल, मुंबई /नागपूर, महाराष्ट्र यांचेकडे पुस्तकी समायोजनाव्दारे (Book Adjustment) सुपूर्द करण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | लेखाशीर्ष (अनिवार्य) | कृषि विद्यापीठे | सन २०२२-२३ करीता सुधारीत तरतूद | आतापर्यंत वितरीत निधी | वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मागणी क्र.जी-३,<br>६०,इतर दायित्वांवरील व्याज<br>१०१, ठेवींवरील व्याज<br>(००)<br>भारित (००)(०५)परिभाषित अंशदान निवृत्तीवेतनाच्या अंशदानावरील व्याज (अनिवार्य)<br>२०४९ २२४६<br>४५,व्याज | म. फु. कृ. वि., राहुरी | ३५००.०० | ०.०० | १०००.०० |
| २ | | डॉ.बा.सा.को.कृ. वि., दापोली | | ०.०० | १०००.०० |
| ३ | | डॉ.पं.दे.कृ.वि., अकोला | | ०.०० | १०००.०० |
| ४ | | व.ना.म.कृ.वि., परभणी | | ०.०० | ५००.०० |
| | **एकूण** | | **३५००.००** | **०.००** | **३५००.००** |

२. या शासन निर्णयान्वये, परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेअंतर्गत विद्यापीठातील अधिकारी/ कर्मचारी यांचे दि.०१/०४/२०२२ ते दि.३१/०३/२०२३ नियमीत मासिक अंशदान व शासनाचे समतुल्य अंशदान अशा एकत्रित जमा रक्कमेवरील व्याजाचा खर्च भागविण्यासाठी जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, रत्नागिरी, अकोला व परभणी यांनी एकुण रु.३५,००,००,०००/- (रुपये पस्तीस कोटी फक्त) या व्याजाच्या रकमेचे समायोजन करुन अभिलेखाकित करण्याची व नोंद घेण्याची कार्यवाही करण्यांत यावी.

३. सदर खर्च "मागणी क्र. जी -३, २०४९- व्याज प्रदाने, ६०- इतर दायित्वांवरील व्याज, १०१- ठेवींवरील व्याज, (००)(००)(०५) - अंशदान निवृत्तीवेतनाच्या अंशदानावरील व्याज (अनिवार्य) (२०४९ २२४६), ४५- व्याज (भारीत)" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ च्या मंजूर सुधारीत अर्थसंकल्पीय तरतूदीतून पुस्तकी समायोजनांव्दारे भागवावा तसेच मंजूर अनुदानापेक्षा जास्त होणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. या शासन निर्णयात मंजुर केलेली अनुदाने पुढील अर्टी व शर्तीच्या अधीन आहेत:-

१. राज्यातील चारही कृषि विद्यापीठांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे डिसीपीएसचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.
२. राज्यातील चारही कृषि विद्यापीठांनी ही अनुदाने ज्या प्रयोजनासाठी मंजूर केली आहेत. त्याच प्रयोजनासाठी (परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेत राज्यातील चारही कृषि विद्यापीठांतर्गत अधिकारी / कर्मचारी यांचे नियमीत मासिक अंशदान व समतुल्य शासनाचे अंशदान अशा एकत्रित रकमेवर व्याज देण्यासाठी [व्याज जमा करण्याचे लेखाशिर्ष "८३४२- इतर ठेवी, ११७-कर्मचाऱ्याकरिता परिभाषीत अंशदान निवृत्ती वेतन योजना (०१)(०१)- परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना ४५ - शासनाचे व्याज (८३४२ ५०९९)] खर्च करावीत.
३. वित्त विभागाने प्रत्येक वर्षी व्याजाचे दर निश्चित करणारे शासन निर्णय निर्गमित केले आहेत. त्यानुसारच व्याजाची आकारणी करावी तसेच व्याजाची परिगणना करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमीत परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनानुसार कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.तसेच हा खर्च याच कारणासाठी करण्यात आला असल्याबाबत उपयोगीता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय तसेच या विभागास पाठवावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९२०३०५२८५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2023.03.29 20:35:45 +05'30'

**(मिताली चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,

**प्रत,**

१. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,

२. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक,महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर,
३. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली, जि.रत्नागिरी,
४. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला, जि.अकोला,
५. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी, जि.परभणी,
६. महालेखापाल (स्थानिक लेखा परीक्षा व लेखा), महाराष्ट्र, मुंबई,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/ रत्नागिरी /अकोला/ परभणी
८. उपकोषागार अधिकारी, राहूरी, जि.अहमदनगर/ दापोली, जि.रत्नागिरी/ अकोला/ परभणी,
९. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर/दापोली/अकोला/परभणी,
१०.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१२.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१३.उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१४.वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-२/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१५.कक्ष अधिकारी, कार्यासन २अे/६अे/ पदुम-१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१६.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.